**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन आदेश क्रमांकः बदली-२०२३/प्र.क्र.४०/१४-अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: ११ मे, २०२३

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (१), ४ (२) व ४ (३) अनुसार खाली नमूद केलेल्या मंत्रालयीन विभागातील निम्नश्रेणी लघुलेखकांची आंतरविभागीय बदली करण्यात येत असून, त्यांच्या नावासमोरील स्तंभ-५ मध्ये दर्शविलेल्या विभागात त्यांची बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | श्री / श्रीमती | निम्नश्रेणी लघुलेखकाचे नांव | सध्याचा विभाग | बदलीनंतर पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री | सचिन चंद्रकांत साळुंखे (म) | सामान्य प्रशासन विभाग | जलसंपदा विभाग |
| २ | श्री | संभाजी रावसाहेब सांगळे (इं) | महसूल व वन विभाग | आदिवासी विकास विभाग |
| ३ | श्री | शिवराज विरभद्र पत्रे (म) | महसूल व वन विभाग | शालेय शिक्षण व क्रिडा विभाग |
| ४ | श्री | श्रीनिवास राम ताटेवाड (म) | शालेय शिक्षण व क्रिडा विभाग | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग |
| ५ | श्री | समीर लक्ष्मण पवार (म) | वित्त विभाग | सार्वजनिक बांधकाम विभाग |
| ६ | श्री | कुलदीपसिंह ओमप्रकाशसिंह राजपूत (इं) | सार्वजनिक बांधकाम विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ७ | श्रीमती | रेखा जयराम पात्रे (म) | जलसंपदा विभाग | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग |
| ८ | श्री | रुपेश मधुकर कोलते (इं) | विधि व न्याय विभाग | महसूल व वन विभाग |
| ९ | श्रीमती | प्रियांका भिवाजी शिंदे (म) | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग | नियोजन विभाग |
| १० | श्रीमती | रुपाली वेडू राऊत (म) | नियोजन विभाग | गृहनिर्माण विभाग |
| ११ | श्रीमती | रोशनी रविकांत सोनुने (म) | गृहनिर्माण विभाग | वित्त विभाग |
| १२ | श्रीमती | स्नेहा किशोर शेटे (म) | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | महसूल व वन विभाग |
| १३ | श्री | संघदीप तुलसीराम मेश्राम (इं) | आदिवासी विकास विभाग | विधि व न्याय विभाग |

२. **उपरोक्त नमूद कर्मचाऱ्यांना दि. १५.०५.२०२३ (म.पू.) पासून रकाना क्र.४ मधील नमूद विभागातून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे.**

३. सदर आदेश हेच कार्यमुक्ततेचे आदेश असून संबंधित विभागांनी नव्याने आदेश काढण्याची आवश्यकता नाही.

४. सदर कर्मचारी दिनांक १५ मे, २०२३ (म.पू.) रोजी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास त्यांचेविरुद्ध शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१६/प्र.क्र.१८६/१६/कार्यासन १४, दिनांक २३ डिसेंबर २०१६ मधील तरतूदींनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

५. बदली झालेल्या कर्मचाऱ्यांनी त्यांची बदली रद्द करणे अथवा त्यासाठी प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्षरित्या दबाव आणल्यास संबंधितांची कृती गैरवर्तणूक समजण्यात येईल.

६. आहरण व संवितरण अधिकारी तसेच अधिदान व लेखा अधिकारी यांना कळविण्यात येते की, उपरोक्त कर्मचाऱ्यांचे दि.०१ मे, २०२३ पासूनचे वेतन कोणत्याही परिस्थितीत पुर्वीच्या विभागातून अदा करण्यात येवू नये अन्यथा त्यांना व्यक्तीश: जबाबदार धरण्यात येईल.

७. मंत्रालयीन विभागातील सर्व संवर्गातील अधिकारी/कर्मचाऱ्यांना राज्य प्रशिक्षण धोरणानुसार बदलीनंतरच्या प्रशिक्षणाची कार्यवाही करण्यासंदर्भात शासन परिपत्रक क्रमांक : कअनि-१११६/प्र.क्र.३२/१४-ब, दिनांक २३.५.२०१६ अन्वये सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्यानुसार विभागात बदलीने रुजू झालेल्या कर्मचाऱ्यांना बदलीनंतरचे प्रशिक्षण संबंधित मंत्रालयीन विभागांनी आयोजित करावे.

८. संबंधित विभागांनी सदर कर्मचारी त्यांचे विभागात रुजू झाल्याबाबतची माहिती सामान्य प्रशासन विभागास (कार्यासन १४-अ) त्वरीत सादर करावी.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५१११६०३०४६४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.05.11 16:04:55 +05'30'

**( वि. बा. माने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

संबंधित निम्नश्रेणी लघुलेखक (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

**प्रत,**

१) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
२) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग
३) सह सचिव/उप सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग
४) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, ठाकरसी हाऊस, बॅलार्ड पिअर, सुरजी वल्लभदास रोड, मुबई-४००००१.
५) आहरण व संवितरण अधिकारी, संबंधित मंत्रालयीन विभाग
त्यांना कळविण्यात येते की, बदली केलेल्या सर्व निम्नश्रेणी लघुलेखकांना दिनांक १५.०५.२०२३ (म.पू.) पर्यंत कार्यमुक्त करणे अत्यावश्यक असून कार्यमुक्त केलेल्या निम्नश्रेणी लघुलेखकांचे दिनांक ३०.०४.२०२३ पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या विभागाने काढावे. दिनांक ०१.०५.२०२३ पासूनचे वेतन बदलीपूर्वी कार्यरत असलेल्या विभागातील संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी अदा केल्यास त्यांना याबाबत व्यक्तिश: जबाबदार धरण्यात येईल व त्यांच्याविरुध्द नियमानुसार योग्य ती कारवाई करण्यात येईल.
६) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
त्यांना कळविण्यात येते की, बदली केलेल्या सर्व निम्नश्रेणी लघुलेखकांचे दिनांक ३०.०४.२०२३ पर्यंतचे वेतन सध्या कार्यरत असलेल्या विभागामार्फत अदा करावयाचे आहे. दिनांक ०१.०५.२०२३ पासूनचे वेतन बदली झालेल्या विभागामार्फत अदा करावयाचे आहे. सदर सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
७) निवड नस्ती (संग्रहार्थ /कार्यासन १४-अ).